**पणन संचालक पुणे कार्यालयातील एक विधी अधिकारी (कंत्राटी) व जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था छत्रपती संभाजीनगर कार्यालयातील एक सहायक विधी अधिकारी (कंत्राटी) यांना अनुज्ञेय परिश्रमिक अदा करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: कृबास २०२४/प्र.क्र.२५०/११-स**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दि. १८ फेब्रुवारी २०२५

<u>वाचा</u> :- सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय मुंबई शासन निर्णय क्र-कृबास २०२३/प्र.क्र.१२९/११-स दि.१७ मे २०२४

**<u>प्रस्तावना:-</u>**

मा.उच्च न्यायालयाच्या औरंगाबाद खंडपीठाने रिट याचिका क्र. ३०९४/२०२१ मध्ये दि.१२.०७.२०२३ रोजी दिलेले आदेश विचारात घेऊन वित्त विभागाकडे पणन विभागाने १ विधि अधिकारी व ३ सहायक विधी अधिकारी या काल्पनिक पदांची निर्मिती करण्याबाबत प्रस्ताव सादर केला होता. त्यास अनुसरुन वित्त विभागाच्या दि.०९ जून २०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये गठीत उपसमितीने दिलेल्या मान्यतेनुसार पणन संचालनालय, पुणे यांच्या कार्यालयात १ विधी अधिकारी आणि जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था, छत्रपती संभाजीनगर, जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था, नागपूर व मंत्रालयीन स्तरावर प्रत्येकी १ असे ३ सहायक विधी अधिकारी अशी एकूण चार पदे बाह्ययंत्रणेद्वारे तात्पुरत्या स्वरुपात कंत्राटी पध्दतीने भरण्याकरीता वाचा येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे.

पणन संचालक,पुणे यांनी विहित कार्यपद्धतीने जाहिरात देऊन छाननीअंती दि.१०.०४.२०२४ अन्वये विधी अधिकारी, पुणे तसेच सहायक विधी अधिकारी, मुंबई व छत्रपती संभाजीनगर या पदांकरीता कंत्राटी पध्दतीने नियुक्तीसाठी अधिकाऱ्यांची शिफारस शासनास केली होती. सदर शिफारशीस शासन पत्र दि.१६.०४.२०२४ अन्वये मान्यता दिली असून उक्त पदे तात्पुरत्या स्वरुपात कंत्राटी पद्धतीने पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी खालीलप्रमाणे नियुक्त केले आहे.

| अ.क्र | नाव व पदनाम | नियुक्ती केलेले कार्यालय | कार्यालयात रुजु होण्याचा दिनांक |
|---|---|---|---|
| १. | श्री. हेमंत यशवंत मेंडकी,विधी अधिकारी(कंत्राटी) | पणन संचालनालय, पुणे | दि.१८.०६.२०२४ (म.पू.) |

| | | | |
|---|---|---|---|
| २. | श्री.हेमंत संजय अहिवाळे , सहायक विधी अधिकारी(कंत्राटी) | जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था छत्रपती संभाजीनगर यांचे कार्यालय | दि.१८.०६.२०२४ (म.पू.) |
| ३. | श्री. अजितकुमार राजाभाऊ सासवडे, सहायक विधी अधिकारी(कंत्राटी) | पणन उपविभाग,मंत्रालय मुंबई | दि.१५.०७.२०२४(म.पू.) |

श्री.सासवडे,सहायक विधी अधिकारी यांची नियुक्ती प्रशासकिय कारणास्तव शासनाच्या दि.२९.०८.२०२४ रोजीच्या पत्रान्वये रद्द करण्यात आली आहे. सद्यस्थितीत पणन संचालक, पुणे यांच्या कार्यालयात ०१ विधी अधिकारी व जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था छत्रपती संभाजीनगर यांच्या कार्यालयात ०१ सहायक विधी अधिकारी कार्यरत आहेत. सदर कर्मचाऱ्यांना सामान्य प्रशासन विभागाच्या दि.१७.१२.२०१६ व दि.०८.०९.२०२३ रोजीच्या शासन निर्णयानुसार मासिक परिश्रमिक व भत्त्यांची परिगणना करुन अनुज्ञेय परिश्रमिक देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

विधिमंडळाच्या डिसेंबर-२०२४ च्या हिवाळी अधिवेशनामध्ये मुख्य लेखाशिर्ष २४२५००४९ अंतर्गत १०, कंत्राटी सेवा हे उद्दिष्ट नव्याने समाविष्ट करुन व सदर उद्दिष्टाखाली पणन विभागासाठी १ विधी अधिकारी व ३ सहाय्यक विधी अधिकारी अशा एकुण ०४ काल्पनीक पदांच्या मासिक परिश्रमीकाकरिता पणन विभागाच्या एकूण रु.२६.००लक्ष रकमेच्या पुरवणी मागणीच्या प्रस्तावास वित्त विभागाने सध्या कार्यरत विधी अधिकाऱ्यांच्या परिश्रमीक प्रयोजनार्थ रु.१६,५७,४०२/- (अक्षरी रु. सोळा लाख सत्तावन्न हजार चारशे दोन) इतक्या रकमेची पुरवणी मागणी मंजूर केली आहे.

२. वित्त विभागाच्या दि.२५ जुलै, २०२४ च्या शासन परिपत्रकानुसार १०- कंत्राटी सेवा या उद्दीष्टांतर्गत ७०% च्या मर्यादेत निधी वितरण करणे आवश्यक आहे. तथापि, मा. न्यायालयाने दिलेल्या निर्देशानुसार कंत्राटी पद्धतीने भरण्यात आलेली पदे यांना त्यांचे मासिक वेतन देणे ही बाब अत्यावश्यक व अनिवार्य असल्याने, पणन संचालक, पुणे यांच्या कार्यालयातील कार्यरत १ विधी अधिकारी व जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था,छत्रपती संभाजीनगर यांच्या कार्यालयातील कार्यरत १ सहायक विधी अधिकारी यांच्या नियुक्तीच्या कालावधीकरिता (दि.१८.०६.२०२४ ते दि.२८.०२.२०२५), तसेच सदर कर्मचाऱ्यांच्या नियुक्त्या विहित कार्यपद्धती अनुसरुन करण्यात आल्या आहेत या धारणेस अधिन

आर्थिक वर्ष सन २०२४-२५ करिता, पुरवणी मागणीद्वारे मंजुर झालेला रु.१६.५७ लक्ष इतका निधी वित्त विभागाने वितरीत करण्यास मान्यता दिली आहे.

३. सद्यस्थितीत कार्यरत विधी अधिकारी यांच्या मासिका परिश्रमिकासाठी खालील नमूद केल्याप्रमाणे संबंधित अधिकाऱ्यांच्या नावासमोरील दर्शविण्यात आलेल्या रकानामध्ये मासिक परिश्रमापोटी रक्कम मंजूर करण्यात येत आहे.

| **अ. क्र** | **नाव व पदनाम** | **नियुक्तीचे ठिकाण** | **मासिक परिश्रमिक वेतन** | **कालावधी** | **मासिक परिश्रमापोटी मंजूर रक्कम** |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री. हेमंत यशवंत मेंडकी,विधी अधिकारी(कंत्राटी) | पणन संचालनालय, पुणे | रु.९५,८४५/- | दि.१८.०६.२०२४ ते दि.२८.०२.२०२५ | रु.८,०८,२९२/- |
| २ | श्री.हेमंत संजय अहिवाळे, सहायक विधी अधिकारी(कंत्राटी) | जिल्हा उपनिबंधक सहकारी संस्था छत्रपती संभाजीनगर यांचे कार्यालय | रु.१,००,६८५/- | दि.१८.०६.२०२४ ते दि.२८.०२.२०२५ | रु.८,४९,११०/- |
| | | | | **एकुण** | **रु.१६,५७,४०२/-** |

**(अक्षरी रु.सोळा लाख सत्तावन्न हजार चारशे दोन)**

४. कंत्राटी तत्वावर नियुक्त करण्यात आलेले विधी अधिकारी व सहायक विधी अधिकारी यांचे परिश्रमीक या विभागाच्या "मागणी क्र.व्ही-२,मुख्य लेखाशिर्ष-२४२५-सहकार,००१,संचालन व प्रशासन,(०१) संचालन व प्रशासन, (०१) (०३), पणन संचालक (अनिवार्य) (२४२५ ००४९) मध्ये १०- कंत्राटी सेवा" या उद्दीष्टाखाली लेखाशिर्षातून सन २०२४-२५ वर्षीच्या उपलब्ध निधीमधून भागविण्यात यावा. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.१५/२०२५/व्यय-२ दि.०३.०२.२०२५ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०२१८१२१४४७५६०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHAILESH
SHASHIKANT SURVE

Digitally signed by SHAILESH SHASHIKANT SURVE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT,
2.5.4.20=de61ac402ef01eec8d6c6d90fb32c82cc308744e2b851cc16fb39fe7ce1f1dd3, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=0E8ED2F069FE90F6EA4E2DFC43BD83581600732F141DAF3517043067D7724F4B, cn=SHAILESH SHASHIKANT SURVE
Date: 2025.02.18 12:16:57 +05'30'

**( शैलेश श. सुर्वे )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रतिः-**

१.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई

२. महालेखापाल-१, महाराष्ट्र (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई

३. पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे

४. अवर सचिव, वित्त विभाग मंत्रालय मुंबई

५. अवर सचिव, कार्यासन १७-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई

६.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/छत्रपती संभाजीनगर

७.निवडनस्ती.